**मुंबई उच्च न्यायालयातील शिपाई संवर्गातील १५ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे न करता सदर पदे नियमित स्वरुपात निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदनि-५९१४/२३६/(१८)/का.चार**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३० जानेवारी, २०१८

**संदर्भ -**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. RG/१६११/५३/२०१४, दि.२५/०६/२०१४, पत्र क्र G/१८६२/३७६/२०१४, दि. २५/११/२०१४ व RG/१६११/२२/२०१७, दि. १०/०३/२०१७.

२) प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. P&E/३२५/२०१६, दि. ०१/०६/२०१६.

३) शासन निर्णय समक्रमांक दि. १७/०५/२०१६ व शुध्दिपत्रक दि. ०७/०६/२०१६.

४) उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. २६/१०/२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना -**

मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमूर्तींच्या संख्येत झालेल्या वाढीस अनुसरुन त्यांचेकरिता आवश्यक ८६ सहाय्यभूत पदांच्या निर्मितीचा प्रस्ताव उच्च न्यायालयाने सादर केला होता. सदर प्रस्तावास उच्चस्तर सचिव समितीने दि. २६/०४/२०१६ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार ८६ पैकी विविध संवर्गातील ७१ सहाय्यभूत पदे नियमित स्वरुपात निर्माण करण्यास मान्यता देऊन उर्वरित शिपाई संवर्गातील १५ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करण्यास मान्यता दिली होती. त्यानुसार संदर्भाधीन शासन निर्णय दि. १५/०५/२०१६ व शुध्दिपत्रक दि. ०७/०६/२०१६ निर्गमित करण्यात आले आहेत.

तथापि, शिपाई संवर्गातील सदर १५ पदांच्या कामाचे स्वरुप विचारात घेऊन सदर पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे न करता ती उच्च न्यायालयाच्या आस्थापनेवर नियमित स्वरुपात निर्माण करण्यास मान्यता देण्याची फेरविनंती उच्च न्यायालयाने केली होती. त्यानुसार सदर पदे उच्च न्यायालयाच्या आस्थापनेवर नियमित स्वरुपात निर्माण करण्यास मान्यता देण्याचा उच्च न्यायालयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन शासन निर्णय दि. १७/०५/२०१६ व शुध्दिपत्रक दि. ०७/०६/२०१६ अन्वये उच्च न्यायालय, मुंबई च्या मूळ शाखा, अपील शाखा, तसेच औरंगाबाद व नागपूर खंडपीठाच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील ७१ सहाय्यभूत पदे नियमित स्वरूपात निर्माण करण्यास तसेच शिपाई संवर्गातील १५ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर शिपाई संवर्गातील (वेतनश्रेणी रु. ४४४०-७४४० + ग्रेड पे १३००) १५ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे न करता सदर पदे उच्च न्यायालयाच्या मूळ शाखा, अपील शाखा, तसेच औरंगाबाद व नागपूर खंडपीठाच्या आस्थापनेवर नियमित स्वरूपात निर्माण करण्यास व त्यानुषंगाने त्यांच्या वेतनावर होणाऱ्या आवर्ती खर्चास सदर शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२.	सदर शिपाई संवर्गातील १५ पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| पदनाम | मुंबई उच्च न्यायालय | | नागपूर खंडपीठ | औरंगाबाद खंडपीठ | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | मूळ शाखा | अपील शाखा | | | |
| शिपाई (वेतनश्रेणी रु. ४४४०-७४४० + ग्रेड पे १३००) | १० | ०२ | ०१ | ०२ | १५ |

३.	नवीन पदनिर्मितीमुळे होणारा खर्च हा मूळ शाखेवरील पदांकरिता "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (००), १०२ उच्च न्यायालये (०२) (०१) प्रबंधक, मूळ शाखा (२०१४ ००७४) (अनिवार्य) ०१ वेतन" तसेच अपील शाखेवरील पदांकरिता "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (००), १०२ उच्च न्यायालये (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा (२०१४ ००९२) (अनिवार्य) ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्याअंतर्गत त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४.	प्रस्तुत शासन निर्णय हा उच्चस्तर सचिव समितीच्या दि. २६/१०/२०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेअंती निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०५१५३४३२९०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra D Sawant

Digitally signed by Rajendra D Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6c5df198d588de75e335db20487f4df45c73eca4ce5875cd77fd8b1924a3fdf8, serialNumber=997cb12aac35c749b0ddeeaa870ff7ec4f5bd55e7f751d37a63fbc967395f74e, cn=Rajendra D Sawant
Date: 2018.06.05 15:36:35 +05'30'

**( राजेंद्र सावंत )**
सह सचिव नि विधी व सल्लागार

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे स्वीय सहाय्यक, राजभवन, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई
३. मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
४. महाप्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-एक, मुंबई.

६. महालेखापाल(लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-दोन, नागपूर.
७. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
८. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर/औरंगाबाद
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद
१३.वित्त विभाग, व्यय-६/अर्थ ११/वित्तीय सुधारणा
१४.कार्यासन अधिकारी, का. २३/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती.